**प्रशासकीय मान्यता**
**लोहा, जिल्हा नांदेड येथे न्यायालयाच्या आवारात दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर यांच्याकरिता दोन निवासस्थाने बांधण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग,**
**शासन निर्णय क्र.सीआरक्यू-१२२१/प्र.क्र.८२/का-१३,**
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ०३ डिसेंबर, २०२१.

**पहा** :- १) मा.प्रबंधक (निरिक्षणे-२) मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई यांचे क्र.B(W) ६०६३/१९९७(२९)/१३०८/२६६४३, दिनांक १९ ऑक्टोबर, २०२१ चे पत्र.
२) प्रमुख न्यायाधीश, कौटुंबिक न्यायालय, औरंगाबाद यांचे दिनांक १९ जानेवारी, २०२१ चे पत्र.

**प्रस्तावना :-**

लोहा, जिल्हा नांदेड येथे न्यायालयाच्या आवारात दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर यांच्याकरिता दोन निवासस्थाने बांधण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर करण्यात आला होता. सदरहू प्रस्तावास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

लोहा, जिल्हा नांदेड येथे न्यायालयाच्या आवारात दिवाणी न्यायाधीश कनिष्ठ स्तर यांच्याकरिता दोन निवासस्थाने बांधण्याबाबत रु. २,५७,२६,०००/- (रूपये दोन कोटी सत्तावन्न लक्ष सव्वीस हजार फक्त) इतक्या अंदाजित खर्चाच्या कामास (खाली नमूद केलेल्या विगतवारीनुसार) या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र | तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| (अ) | **आवश्यक बाबी** | |
| १ | (a) बांधकामाचा खर्च | १,३७,७०,८५६/- |
| | (b) रेन/रुफ वॉटर हार्वेस्टींग | ५,००,०००/- |
| | (c) सोलार रुफ टॉप सिस्टिम | १०,००,०००/- |
| २ | पाणी पुरवठा मल:निस्सारण ( बांधकाम खर्चाच्या ५%) | ४,४०,२१७/- |
| ३ | विद्युतीकरण | |
| | अंतर्गत विद्युतीकरण ( बांधकाम खर्चाच्या ५%) | ४,४०,२१७/- |
| | बाहय विद्युतीकरण ( बांधकाम खर्चाच्या ६%) | ५,२८,२६०/- |
| | **एकूण (अ)** | **१,६७,१३,०२८/-** |

| | | |
|---|---|---|
| (ब) | **संकिर्ण बाबी** | |
| | (१) कंपाऊंड वॉल व गेट | २४,००,०००/- |
| | (२) अंतर्गत सिमेंट रस्ते | २१,००,०००/- |
| | (३) वाहतूक व्यवस्था | १०,००,०००/- |
| | (५) सीसीड्रेन आणि सीडी वर्कस् | २०,००,०००/- |
| | **एकूण (ब)** | **७५,००,०००/-** |
| **(क)** | **वैकल्पिक बाबी** | |
| | (२) वॉटर मेन स्टोरेज, पंप हाऊस, बोअरवेल | १०,००,०००/- |
| | (५) बागबगीचा | ५,००,०००/- |
| | **एकूण (क)** | **१५,००,०००/-** |
| | **प्रकल्प खर्च (अ)+(ब)+(क)** | **२,०७,१३,०२८/-** |
| **(ड)** | इतर तरतूदी | |
| | आकस्मिक खर्च ( बांधकाम खर्चाच्या ४%) | ३,५२,१७३/- |
| | इन्शूरन्स चार्जेस | १,०३,५६५/- |
| | भाववाढ | २०,७१,३०३/- |
| | वस्तू व सेवा कर (प्रकल्प खर्चाच्या १२%) | २४,८५,५६३/- |
| | **एकूण (ड)** | **५०,१२,६०४/-** |
| | **एकूण प्रकल्प खर्च रुपये (अ)+(ब)+(क)+(ड)** | **२,५७,२५,६३२/-** |
| | **म्हणजेच एकूण रुपये** | **२,५७,२६,०००/-** |

**२. ही प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-**

अ) बांधकाम सुरु करण्यापुर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच बांधकाम सुरु करावे.

ब) सदरचे अंदाजपत्रक हे ढोबळ नमुना अंदाजपत्रक असल्याने, या कामांच्या सविस्तर अंदाजपत्रकांना तांत्रिकदृष्ट्या मान्यता देत असताना प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नांदेड यांच्या सहमतीने तरतूदी अंतीम करण्यात याव्यात.

क) नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुन सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.

ड) सदर कामाची निविदा काढतांना प्रत्येक कामाची स्वतंत्रपणे निविदा न काढता नमूद सर्व कामांसाठी एकत्र एकच निविदा काढण्यात यावी.

ई) काम सुरू करण्यापुर्वी सर्व संबंधित स्थानिक संस्था/प्राधिकरणे यांची मान्यता घेण्यात यावी.

फ) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७/तां.क.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.

ग) सावर्जनिक बांधकाम विभागाच्या शासन निर्णय क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमारती-२, दिनांक ७ जुलै, २०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.

ह) सदर कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी.

**३.** या प्रित्यर्थ होणारा खर्च "मागणी क्र.एच-७, ४२१६ गृहनिर्माणावरील भांडवली खर्च-०१ शासकीय निवासी इमारती-७००, इतर गृहनिर्माण (०१) न्यायदान-केंद्र पुरस्कृत योजना (राज्य हिस्सा) (०१)(०१) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६०२९१) व केंद्र हिस्सा (०३)(०४) मोठी बांधकामे-५३ मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२१६०५२२)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. मात्र, **अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय कामास सुरुवात करण्यात येऊ नये.**

४. हे आदेश सार्वजनिक बांधकाम विभाग, परिपत्रक, क्र.संकिर्ण-२०१९/प्र.क्र.१०/इमा-२, दिनांक २५ सप्टेंबर, २०१९ अन्वये मा. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम, प्रादेशिक विभाग, मुंबई यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेनुसार तसेच, नियोजन विभाग, परिपत्रक, क्र.ससमा-२०१०/प्र.क्र.४८/भाग-१/का-१४६१, दिनांक ११ जून, २०१८ मध्ये नमूद केल्यानुसार विभागास असलेल्या अधिकारानुसार व वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२ दिनांक १७ एप्रिल, २०१५ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग पहिला, उपविभाग-पाच, अनुक्रमांक १, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तिकेतील परिच्छेद क्र. १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये संबंधित सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११२०३१५१३५९४०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

NITIN V JIWANE

Digitally signed by NITIN V JIWANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=LAW AND JUDICIARY DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=eaafa52b8f5b995089773c42d6ed2475cd061a337b724d471400fbcfb074e051, pseudonym=00D295F198C67FDB7031897066C5804DA623172E, serialNumber=38DA45FC182DE9210D4220CD41371018A4D6F00892E5D1478CBA8413AFB06C03, cn=NITIN V JIWANE
Date: 2021.12.03 15:17:59 +05'30'

**(नितिन वि. जिवने)**
**विधि सल्लागार-नि- सह सचिव,**
**महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा.अध्यक्ष विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
२. मा. सभापती विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
३. मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा / विधान परिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,मुंबई.
४. मा.महाप्रबंधक, मा.उच्च न्यायालय , मुंबई,

५. मा.प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, नांदेड.
६. मा.प्रबंधक (निरीक्षण-२), मा.उच्च न्यायालय (अपिल शाखा) , मुंबई,
७. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-दोन, नागपूर.
८. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, औरंगाबाद.
९. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, नांदेड.
१०.कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नांदेड
(मूळ अंदाजपत्रक व आराखडे यांच्यासह)
११.उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम उपविभाग, लोहा, नांदेड
१२.जिल्हा कोषागार अधिकारी, जि. नांदेड,
१३.सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१४.वित्त विभाग/व्यय-६,मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१५.नियोजन विभाग,१४४३, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१६.अपर आयुक्त व सदस्य सचिव, उर्वरित महाराष्ट्र वैधानिक विकास मंडळ, १८ वा मजला, नवीन प्रशासकीय भवन, मंत्रालयासमोर, मुंबई-४०० ०३२.
१७.महासंचालक , माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१८. कक्ष अधिकारी, का.७, ११ व १२,विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
१९.निवड नस्ती/संग्रहार्थ.